“प्रकल्प अंमलबजावणी समितीची
(Project Implementation Committee)
स्थापना करण्याबाबत”

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : ईएलआर-२०१५/प्र.क्र. २९२/१५/३३
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २० जून, २०१५

प्रस्तावना-

भारत निवडणूक आयोगाच्या नियंत्रणाखाली महाराष्ट्र राज्यामध्ये लोकसभा/राज्यसभा आणि विधानसभा/विधानपरिषद सभासदत्वासाठी सार्वत्रिक निवडणूकांचा तसेच पोट निवडणूकांचा कार्यक्रम पार पाडण्याची जबाबदारी मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे वर सोपविण्यात आली आहे. या निवडणूक कार्यक्रमामध्ये “मतदार यादी” ही सर्वात महत्वाची बाब आहे. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० मधील तरतूदीनुसार ही यादी वेळोवेळी अद्ययावत करण्यात येत असते.

२. सध्याच्या युगामध्ये मतदार यादी अद्ययावत करण्यासाठी भारत निवडणूक आयोगाच्या निर्देशानुसार विविध संगणकीय प्रणालींचा वापर करण्यात येत आहे. संगणकाचे माध्यमातून मतदार यादी तयार करण्याकरिता मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालयासाठी mahaonline व NIC चे तांत्रिक मनुष्यबळ घेण्यात येत आहे. त्याचप्रमाणे .pdf Format मध्ये मतदार यादी तयार करणे, मराठी, उर्दू व इंग्रजी भाषेमध्ये भाषांतरीत मतदार यादी तयार करणे, BLO चे Register तयार करणे, छायाचित्र मतदार यादी तयार करणे इत्यादी कामे बाहयस्त्रोताद्वारे, एका अभिकर्त्याद्वारे, करुन घेण्यात येत आहेत. सदर अभिकर्त्याची मुदत दिनांक ३१.१२.२०१५ पर्यंत आहे. या मुदतीनंतर नवीन अभिकर्ता नेमावा लागणार आहे. त्यासाठी ई-निविदा प्रक्रियेचा अवलंब करावयाचा आहे.

३. सदर काम हे पूर्णत: तांत्रिक स्वरुपाचे आहे. त्यामुळे निविदा सूचना तयार करण्यापासून ते निविदांची छाननी करुन व्यावहारीक दृष्टीने सक्षम अभिकर्त्यांची निवड करणे या बाबींसाठी तांत्रिक सल्लागाराची नेमणूक करणे आवश्यक आहे. शासन निर्णय, DIT, दिनांक ०१/७/२०१४ अन्वये e-Governance Programme राबविण्यासाठी शासनाने पुढीलप्रमाणे एकुण ५ प्रख्यात तांत्रिक सल्लागारांचे पॅनल स्थापित केले आहे.

१) M/s Accenture
२) M/s Deloitte
३) M/s Ernst & Young
४) M/s KPMG
५) M/s PWC

४. तरी, उपरोक्त पाच प्रख्यात तांत्रिक सल्लागारांपैकी एका सल्लागाराची निवड करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २१.०९.२०१२ अन्वये विभागाची

प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वर नमूद केल्याप्रमाणे पाच प्रख्यात तांत्रिक सल्लागारांपैकी एका सल्लागाराची निवड करण्यासाठी पुढीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापना करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी | - अध्यक्ष |
| सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| संचालक, माहिती तंत्रज्ञान किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य | - सदस्य |
| अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी | - सदस्य सचिव |

२. सदर समितीने, उपरोक्त पाच प्रख्यात तांत्रिक सल्लागारांना, मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना अपेक्षित असलेल्या कामाची व्याप्ती स्पष्ट करुन, या समितीपुढे सादरीकरण करण्याच्या सूचना द्यावयाच्या आहेत. सदर सादरीकरणा नंतर त्या त्या सल्लागाराचे सादरीकरण व तांत्रिक क्षमता यांचा विचार करुन मुख्य निवडणूकअधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना व्यवहार्य ठरेल असा सल्लागार नेमण्याची शिफारस करावयाची आहे. या समितीने एक महिन्याचे आत ही कार्यवाही पूर्ण करणे अपेक्षित आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२०१६५२२५२३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Shirish Mohod

Digitally signed by Shirish Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Mohod
Date: 2015.06.29 12:38:54 +05'30'

**( शिरीष मोहोड )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. अ.मु.स., वित्त विभाग, नियोजन विभाग, उद्योग विभाग व माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
२. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय
३. मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
४. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक
५. निवडनस्ती